**यशवंत ग्राम समृध्दी योजना**

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक यग्रावि २००१/प्र.क्र. ११४/पंरा-६ (४७),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २७ ऑगस्ट, २००२.

**प्रस्तावना :-**

यशवंत ग्राम समृध्दी योजनेचा मुख्य उद्देश नियोजनामध्ये, ज्यांच्यासाठी योजना राबवावयाच्या आहेत त्यांचा, म्हणजेच गांवक-यांचा सहभाग वाढवून निर्णय प्रक्रियेत त्यांना सक्रीय केल्यास योजना यशस्वी होण्यास मदत होईल व लोकशाहीचे बीज तसेच राज्यातील विकास कामांची माहिती प्रत्यक्षात गांवापर्यंत पोहोचेल व ज्या कामांची खरोखरच गरज आहे व जे काम प्राधान्याने करणे आवश्यक आहे अशी कामे गांव पातळीवर घेऊन ख-या अर्थाने गांवामध्ये लोकांच्या सहभागातून ग्राम समृध्दी करावी असा आहे.

**सध्याच्या नियोजनाची कार्यपध्दती :-**

सध्याच्या नियोजन प्रक्रियेत निधी वितरण व गांवाला आवश्यक सुविधा याचा निर्णय जिल्हा स्तरावर / मंत्रालय स्तरावर होत असतो. या पध्दतीमुळे प्रत्येक गांवाची गरज लक्षात घेऊन कामाचे नियोजन होत नाही. त्यामुळे स्थानिक लोकांचा त्या योजनेत सहभाग / स्वारस्य नसते. कारण त्या मालमत्तेवर त्यांचे स्वामित्व नसते. हा सहभाग घडवून आणण्यासाठी व विकासाच्या कामात लोकांचा सहभाग घेण्यासाठी व गांवातील सार्वजनिक मालमत्तेची देखरेख लोकांनी करावी, त्याची जबाबदारी घ्यावी यासाठी नियोजनात त्यांचा सहभाग आवश्यक आहे.

सध्या गांवातील कामे बाहेरील कंत्राटदारांमार्फत किंवा वरिष्ठ कार्यालयामार्फत कंत्राटदार नेमून केली जातात. त्यामुळे गांवातील लोकांचे त्या कामाच्या दर्जावर लक्ष नसते. मात्र, जर हेच काम गांवाने स्वतःचे म्हणून केले तर ते व्यवस्थितपणे व वेळेत पूर्ण होऊ शकेल.

यासाठी शासनाच्या सदर ग्राम समृध्दी योजनेद्वारे गांवाच्या नियोजनात लोकांचा सहभाग वाढविणे, निर्णय प्रक्रियेत त्यांचा सहभाग वाढविणे, ग्राम सभेचे महत्व वाढविणे, लोक वर्गणीद्वारे निधी उपलब्ध करणे व लोकांनी योजनेचा सामाजिक आढावा घेणे (Social Audit) या बाबी अंतर्भूत आहेत.

**शासन निर्णय**

१. महाराष्ट्र शासनाने ऑक्टोबर, २००० मध्ये ७३ वी घटना दुरुस्ती लक्षात घेऊन सत्तेच्या विकेंद्रीकरणावर भर देऊन ९ प्रशासकीय विभागांच्या सुमारे १२४ योजना जिल्हा परिषदांकडे हस्तांतरित केलेल्या आहेत. महाराष्ट्रात पंचायती राज तीन स्तरावरुन राबविले जात आहेत. त्यात

जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्राम पंचायती या संस्थांचा समावेश आहे. या तीनही संस्थांना बळकट करण्याचा मुख्य हेतू, या विकेंद्रीकरणामध्ये अभिप्रेत आहे. याच उद्देशाने आता महाराष्ट्र शासन सन २००२ - २००३ या आर्थिक वर्षापासून राज्यात "यशवंत ग्राम समृध्दी" योजना राबविण्यास मान्यता देत आहे.

## २.निधीची उपलब्धता

सदर योजना नवीन योजना म्हणून अर्थसंकल्पात अंतर्भूत करण्यात आली असून, ग्राम विकास विभागामार्फत नवीन लेखाशिर्ष उघडून आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. यशवंत ग्राम समृध्दी योजनेंतर्गत जी कामे प्रत्येकी रुपये १०.०० लाखांच्या आंत आहेत, अशाच कामांचा अंतर्भाव करण्यांत येईल. एका ग्राम पंचायतीला एका आर्थिक वर्षात जास्तीत जास्त दोन योजना राबविता येतील. ग्राम सभेने याबाबत चर्चेद्वारे गावांसाठी आवश्यक व तातडीचे प्रकल्प प्राधान्याने हाती घ्यावयाचे आहेत.

## ३.निधी वाटप

यशवंत ग्राम समृध्दी योजनेंतर्गत प्राप्त निधी जिल्हा परिषदेमार्फत परस्पर पंचायत समिती व ग्राम पंचायतींना देण्यांत येईल. शासनाने ठरवून दिलेल्या सुत्राप्रमाणे उपलब्ध निधीचे वाटप केले जाईल. तसेच गावाने १५ टक्के लोक वर्गणीची रक्कम जमवून ती पंचायत समितीकडे जमा केल्यावर शासनाकडून अनुदान वाटप करण्यांत येईल. मात्र दलित वस्त्यांमधून लोक वर्गणी १० टक्के जमा करण्यांत येईल. प्रकल्प / योजनेसाठी आवश्यक निधी ४० : ४० : २० या प्रमाणात ग्रामपंचायतींना उपलब्ध करुन दिला जाईल.

योजना राबविण्यामध्ये शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीबरोबरच १५ टक्के लोकवर्गणी आवश्यक असल्याने ज्या गावांमध्ये नियोजनाचा आराखडा करण्यास एकमत होणार नाही, किंवा ग्राम सभेस किमान ४० टक्के सदस्य (प्रत्येक वॉर्डमधील) उपस्थित राहणार नाहीत व जी गावे प्रस्तावित कामास आवश्यक निधीच्या १५ टक्के लोक वर्गणी (मात्र दलित वस्त्यांमधून १० टक्के लोक वर्गणी) म्हणून जमा करणार नाहीत, त्या गावांचा समावेश या योजनेमध्ये करता येणार नाही. त्याचप्रमाणे जे गांव उपलब्ध निधीचा वापर करणार नाही, तो निधी ऑक्टोबर - नोव्हेंबरमध्ये आढावा घेऊन इतर गावांच्या कामासाठी उपलब्ध करुन दिला जाईल. ग्राम सभेच्या शिफारशीनुसार व कामाचा दर्जा पाहून अंतिम देयक अदा करण्यांत येईल.

## ४.ग्राम सभेची जबाबदारी

ग्रामपंचायतीने, यासाठी ग्रामसभेची बैठक आयोजित करणे बंधनकारक करण्यात येत आहे. सदर सभेत ग्राम सभेने खालीलप्रमाणे कार्यवाही करणे आवश्यक आहे :-

१) २००२ ते २००३ या वर्षाचा ग्राम विकासाचा सर्व समावेश आराखडा तयार करणे,

२) नियंत्रणासाठी स्थापन करावयाच्या समित्यांचे अध्यक्ष / उपाध्यक्षांची निवड ग्राम

सभेच्या मान्यतेने करावी. प्रत्येक कामासाठी एक समिती असावी. त्यात ४० टक्के महिला व नियमानुसार अनुसूचित जाती / जमातींसाठी प्रतिनिधीत्व असावे. त्याचप्रमाणे ग्राम पंचायतीचे ५० टक्के सदस्य या समितीवर सदस्य म्हणून राहतील.

३) प्रत्येक योजनेस प्रशासकीय मान्यता ग्रामसभा देईल. तांत्रिक मान्यता मात्र योग्य स्तरावरुन घेण्यात यावी (विहित नियमानुसार)

४) एखाद्या योजनेसाठी उदा. शाळा खोल्या, अंगणवाडी बांधकाम याबाबत असलेले संकल्प चित्र (टाईप प्लॅन) मान्य आराखडा, ग्राम सभेस बदलता येईल. मात्र, वित्तीय मर्यादेपेक्षा अधिक खर्च करता येणार नाही. म्हणजेच, उपलब्ध मान्य निधीमध्येच हे काम करावे लागेल.

५) कामाचे नियोजन - आराखडे तयार करुन घेण्याची जबाबदारी ग्राम सभेकडे राहिल. यासाठी खाजगी तज्ञांची नेमणूक केल्यास, त्याला प्रकल्प खर्चाच्या एक टक्का पर्यंत किंवा जास्तीत जास्त रु. १०,०००/- यापैकी जे कमी असेल इतके मानधन देण्याचे अधिकार ग्रामसभेस राहतील व हा खर्च योजनेच्या खर्चात अंतर्भूत करता येईल.

६) कामावर तांत्रिक देखरेख ठेवण्यासाठी रु. १०००/-दरमहा मानधनावर पदवीधर अभियंत्यांची नेमणूक जास्तीत जास्त दोन महिन्यांसाठी ग्राम पंचायतीस करता येईल व हा खर्च योजनेच्या खर्चात अंतर्भूत करता येईल.

या ग्राम सभेस गट विकास अधिकारी वा त्यांचा प्रतिनिधी यांची उपस्थिती आवश्यक आहे. त्यांनी शासनाच्या यशवंत ग्राम समृध्दी योजनेची संकल्पना गांवक-यास समजावून सांगावयाची आहे व गांवाच्या आवश्यकतेनुसार घ्यावयाच्या कामाची मंजुरी तसेच निधी, कार्यवाहीचे निदेश देणे आवश्यक आहे, याची जबाबदारी ग्रामसेवक व गट विकास अधिकारी यांची राहिल. ग्राम सभेच्या बैठकीचे निमंत्रण लेखी स्वरुपात प्रत्येक घरापर्यंत पोहोचविणे, ही ग्राम सेवकाची जबाबदारी राहील. स्थानिक पातळीवर ग्रामपंचायतीने लोक वर्गणीच्या स्वरुपात किमान प्रती माणसी रुपये ५/- जमविले असतील तर ग्रामपंचायतीने ग्रामसभा निमंत्रित करावी व त्या बैठकांसाठी घ्यावयाच्या कामाशी संबंधित शासकीय अधिकारी उपस्थित रहातील.

**<u>५. योजनेअंतर्गत घ्यावयाची कामे</u> :-**

या योजनेंतर्गत प्रामुख्याने खालील प्रकारची कामे घेण्यात यावीत :-

१) पंचायत राज संस्थांच्या शाळांसाठी शाळा इमारती, क्रिडांगणे, काटेरी तारांशिवाय कुंपणे.

२) अंगणवाडी इमारती,

३) ग्रामपंचायत कार्यालये (सर्व शासकीय कर्मचा-यांच्या कार्यालयासहीत),

४) गावांतर्गत रस्ते व गटारे,

५) दहन व दफन भूमी,

६) बस थांबा शेड,

७) गाव व वाडयांच्या रस्त्यांवरील विद्युतीकरणाची कामे,

८) वाचनालय, व्यायामशाळा, सार्वजनिक सभागृहे,

९) लघुसिंचन कामे,

१०) होडया व वाहतुक माध्यमे खरेदी,

११) पाळणा घरे व डे केअर सेंटर्स,

१२) दुरुस्ती व देखभाल,

१३) अन्य कोणतेही काम.

**बांधकामाव्यतिरिक्त इतर कामे**

१४) शिक्षण प्रक्रियेत सुधारणा राबविणे विषयक कार्यक्रम इत्यादी.

सर्वसाधारणपणे रस्त्यांची कामे करताना रस्त्यांच्या कामाबरोबरच पाण्याचा निचरा होण्यासाठी गटारांची तरतूद अत्यावश्यक असते. काही कारणांमुळे गटाराचे काम होऊ शकले नाही तर केलेला रस्ता कार्यक्षम राहू शकणार नाही. त्या दृष्टीने एकाच अंदाजपत्रकात गटारासह रस्त्याचे कामाची तरतूद करावी. मात्र काही प्रकरणी रस्त्याचे काम झाले असेल परंतु गटाराचे काम झाले नसेल अशा निवडक प्रकरणासाठी गटाराचे काम स्वतंत्रपणे घेण्यात यावे. रस्ते आणि गटारांचे एकत्रित काम करताना आधी गटाराचे काम व नंतर रस्त्याचे काम अशाच क्रमाने काम करण्यांत यावे. गटारातील पाणी पुढे नैसर्गिक नाला / ओढयात मिळेल, वाटेत तुंबून राहणार नाही याबाबत दक्षता घेण्यांत यावी. रस्त्याचे काम करताना खडीकरणाचे काम त्यात अंतर्भूत असावे या दृष्टीने नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक रोहयो १०९९/प्र. ६६/रोहयो-६, दिनांक ४ ऑगस्ट, २००० नुसार कार्यवाही करण्यांत यावी.

बस थांबे बांधावयाची आहेत अशी ठिकाणे, रस्त्यांची रुंदी जिथे पुरेशी आहे अशाच ठिकाणी प्रस्तावित करावी. पुरेशी रुंदी उपलब्ध नसल्यास अतिरिक्त रुंदीसाठी आवश्यक जमीन दानपत्राच्या माध्यमातून मिळविण्याचे प्रयत्न करावे. अतिरिक्त रुंदीसाठी भराव करुनच बस थांबे बांधण्यांत यावेत जेणेकरुन थांब्यावर बस उभी असताना मुख्य रस्त्याची धावपट्टी अन्य वाहतुकीसाठी उपलब्ध राहील व खोळंबा होणार नाही. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या रस्त्यावर बस थांबे इत्यादी बांधावयाचे असल्यास सार्वजनिक बांधकाम विभाग / जिल्हा परिषद यांची आवश्यक ती पूर्वपरवानगी घेण्यांत यावी.

नवीन लघुसिंचन कामे प्रस्तावित करताना अस्तित्वात असलेल्या योजनांच्या जल उपलब्धतेवर विपरित परिणाम होणार नाही याची खात्री करणे आवश्यक आहे. सदर नवीन लघुपाटबंधारे योजना प्रस्तावित करण्यापूर्वी जल निष्पत्तीबाबत पाटबंधारे विभागाकडून तपासणी करुन घ्यावी व नंतरच नवीन योजनेला मंजूरी देण्यांत यावी.

**६. खालील प्रकारची कामे या योजनेत समाविष्ट करता येणार नाहीत :-**

१) स्मारके, शिल्पे, कमानी, प्रवेशद्वार, पुतळे, बांधकाम व त्यासाठी लागणारे कुंड.

२) मंदिर, मशीद, चर्च, इतर कोणत्याही प्रकारच्या धार्मिक स्थळांची बांधकामे,
३) धार्मिक स्थळांसाठी सभामंडप,
४) खाजगी माध्यमिक / उच्च माध्यमिक शाळा व महाविद्यालये यांच्या इमारती,
५) वैयक्तिक लाभाची कामे.

**७. या योजनेच्याअंमलबजावणीमध्ये त्रुटी राहू नयेत म्हणून खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत :-**

१) तालुक्याच्या प्रत्येक विभागाच्या प्रमुख अधिका-यांनी १०० टक्के कामांची तपासणी करणे बंधनकारक राहील.
२) आपल्या अधिपत्याखालील क्षेत्रीय तांत्रिक कर्मचा-यांच्या व प्रशासकीय अधिका-यांच्या कामावर नियंत्रण ठेवणे व साप्ताहीक आढावा घेणे.
३) अपेक्षित अंदाजपत्रकांना विहीत कालावधीमध्ये तांत्रिक मंजूरी देण्यासाठी संबंधित विभाग प्रमुखांनी आढावा घेणे आवश्यक आहे.
४) ग्राम पंचायतींनी लोक वर्गणीचा भरणा केला असल्यास मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी अथवा इतर प्राधिकृत अधिकारी यांनी सदर योजना अग्रक्रमाने मंजूर करावी.
५) या योजनेची अंमलबजावणी प्रभावीपणे होण्यासाठी व त्याबाबत कोणत्याही प्रकारे अनियमितता होऊ नये म्हणून ज्या अधिका-यांवर / कर्मचा-यांवर अंमलबजावणीचे काम सोपविण्यात आले असेल त्या अधिका-यास / कर्मचा-यास संपूर्णपणे जबाबदार धरण्यात येईल.
६) वर नमूद व हस्तांतरित योजनांपैकी, जी कामे संबंधित विभागाकडे सध्या आहेत, ती पूर्ण होईपर्यंत त्यांच्याकडे राहतील. ग्राम विशिष्ट कामे या योजनेंतर्गत घेतली जातील.
७) या योजनेखाली पंचायत समितीने गावनिहाय एकत्रित आराखडा तयार केल्यानंतर गट विकास अधिकारी यांनी पंचायत समिती अंतर्गत घ्यावयाच्या योजना, जमा करण्यात यावयाची लोकवर्गणी व आवश्यक शासकीय अनुदान याबाबतची माहिती मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सादर करावी.

८) मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी गट विकास अधिका-याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाची एकत्रित माहिती व प्रत्यक्ष झालेल्या खर्चाबाबतची माहिती शासनास पाठवावी.
९) यशवंत ग्राम समृध्दी योजनेअंतर्गत प्राप्त झालेला निधी व खर्चाचा स्वतंत्र हिशोब ठेवण्यात यावा.

**८. समित्या**

शासनाच्या महत्वाकांक्षी यशवंत ग्राम समृध्दी योजनेच्या अंमलीबजावणीमध्ये गैरप्रकार होऊ नयेत व योजना गतिमान व्हावी यासाठी राज्य पातळी, जिल्हा पातळी व तालुका पातळीवर पुढीलप्रमाणे समित्या स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे :-

(अ) **राज्यपातळी**

| | | |
|---|---|---|
| १) | मा. मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| २) | मा. मंत्री, ग्राम विकास | उपाध्यक्ष |
| ३) | मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) | सदस्य |
| ४) | मा. मुख्य सचिव | सदस्य |
| ५) | प्रधान सचिव (वित्त) | सदस्य |
| ६) | प्रधान सचिव (नियोजन) | सदस्य |
| ७) | संबंधित खात्याचे सचिव (आवश्यकतेनुसार आमंत्रित) | सदस्य |
| ८) | सचिव, ग्राम विकास | समन्वयक |

(ब) **जिल्हा पातळी**

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्ह्याचा पालकमंत्री | अध्यक्ष |
| २) | अध्यक्ष, जिल्हा परिषद | उपाध्यक्ष |
| ३) | जिल्ह्यातील सर्व आमदार/खासदार | सदस्य |
| ४) | जिल्हा परिषदेमधील सर्व विषय समित्यांचे सभापती | सदस्य |
| ५) | मुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य |
| ६) | संबंधित खात्याचे विभाग प्रमुख | सदस्य |
| ७) | उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) | समन्वयक |

(क) **तालुका पातळी**

| | | |
|---|---|---|
| १) | विधानसभा / विधान परिषद सदस्य (ज्या लोक प्रतिनिधींचा मतदार संघाचा जास्त भाग येत असेल असे) | अध्यक्ष |
| २) | सभापती, पंचायत समिती | उपाध्यक्ष |
| ३) | संबंधित पंचायत समितीचे, जि.प. सदस्य | सदस्य |
| ४) | तालुका पातळीवरील संबंधित खाते प्रमुख | सदस्य |
| ५) | गट विकास अधिकारी | समन्वयक |

जिल्हा व तालुका पातळीवरील समित्या अनुक्रमे संबंधित विभागीय आयुक्त व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी तात्काळ स्थापन कराव्यात.

**९. प्रशिक्षण**

यशवंत ग्राम समृध्दी योजनेची अंमलबजावणी योग्यरित्या व अधिक प्रभावीपणे होण्याकरिता ग्राम पातळीवर, तालुका पातळीवर तसेच जिल्हा व विभागीय पातळीवर अधिकारी व पदाधिकारी यांना आवश्यक प्रशिक्षण देणे जरुरीचे आहे. या कार्यक्रमाचा तपशील स्वतंत्रपणे ठरविण्यात येईल. या प्रशिक्षणात विशेष नियोजन तंत्र व योजनेत सहभागी होण्याचे प्रशिक्षण याचाही समावेश असेल.

**१०. प्रसिध्दी**

या कार्यक्रमास मोठ्या प्रमाणावर प्रसिध्दी देणे आवश्यक असल्याने वर्तमानपत्रे, दूरचित्रवाणी व आकाशवाणी या मुख्य प्रसिध्दी माध्यमामार्फत योजनेची प्रसिध्दी करण्यात यावी. प्रत्येक गावी योजनेची पोस्टर्स व माहितीदर्शक फलक दर्शनी भागावर लावण्यात यावेत. तालुका पातळीवर सर्व शासकीय, निम शासकीय कार्यालये, सहकारी संस्था, एस.टी. थांबे, बँका व विविध महत्वाच्या ठिकाणी योजनेची माहिती प्रकाशित करण्यात यावी. यासाठी योजनेकरिता उपलब्ध निधीच्या एक टक्का इतका निधी राखीव ठेवण्यात येईल. त्यातील जिल्हा परिषदेच्या संपूर्ण कार्यक्षेत्रात उपलब्ध निधीच्या अर्धा टक्का निधी जिल्हा परिषदांना प्रसिध्दीसाठी शासनाच्या मान्यतेने खर्च करता येईल. उर्वरित निधी शासन स्तरावरुन योजनेच्या प्रसिध्दीसाठी खर्च करण्यात येईल.

यशवंत ग्राम समृध्दी योजनेच्या प्रसिध्दीसाठी माहिती व जनसंपर्क महासंचालयाने दूरदर्शन व आकाशवाणीच्या स्थानिक अधिकाऱ्याशी संपर्क साधून कार्यक्रमांना पुरेशी प्रसिध्दी द्यावी.

**११. योजनेचे मूल्यमापन व अहवाल**

योजनेच्या यशस्वी मूल्यमापनाकरिता व आढावा घेण्यासाठी विविध पातळीवरील समित्यांच्या साधारणत: खालीलप्रमाणे बैठका घेण्याचे निदेश देण्यात येत आहेत :-

१) राज्य पातळीवर दर तीन महिन्यांनी,
२) जिल्हा पातळीवर प्रत्येक महिन्याच्या पहिल्या गुरुवारी,
३) तालुका पातळीवर प्रत्येक महिन्याच्या पहिल्या बुधवारी,
४) ग्राम पंचायत पातळीवर दुसऱ्या व चौथ्या शुक्रवारी.

या सर्व आढाव्याचा एकत्रित गोषवारा करुन तो शासनास सादर करण्याची जबाबदारी गट विकास अधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील. शासनाचा प्रस्तुत शासन निर्णय मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी त्यांच्या जिल्ह्यातील सर्व अधिकारी व ग्राम पंचायतीच्या निदर्शनास आणावा. या योजनेची यशस्वी अंमलबजावणी करणाऱ्या गावांना पारितोषिके देण्याबाबत स्वतंत्रपणे योजना जाहीर करण्यात येईल. ही योजना राज्यात सन २००२-२००३ या आर्थिक वर्षापासून राबवावयाची आहे. योजना राबविण्याचे वेळापत्रकदर्शक विवरणपत्र सोबत जोडले आहे.

१२. या योजनेवरील खर्च मागणी क्र.एल-३, २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम-८००-इतर खर्च (६) यशवंत ग्राम समृध्दी योजना (२५१५०४२१) (योजनांतर्गत) या

लेखाशिर्षाखाली सन २००२-२००३ या आर्थिक वर्षासाठी करण्यांत आलेल्या तरतुदीतून करण्यांत यावा.

हे आदेश शासनाच्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ६६८/०२/व्यय १७, दिनांक २३-७-२००२ नुसार व नियोजन विभाग व इतर संबंधित विभागांशी विचारविनिमय करून त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( एस. एस. हुसेन )
सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. माननीय राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. मा. मंत्री व मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
५. मा. मुख्य सचिव,
६. सर्व मंत्रालयीन विभाग,
७. सर्व विभागीय आयुक्त,
८. सर्व जिल्हाधिकारी,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता),
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परिक्षा व अनुज्ञेयता),
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, (गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांच्या प्रतीसह)
१३. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,
१४. सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी
१५. संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई, (प्रसिध्दीसाठी)
१७. ग्राम विकास विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी,
१८. ग्राम विकास विभागातील सर्व कार्यासने व लेखाशाखा,
१९. निवड नस्ती, कार्यासन पं.रा.-६ (४७), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

## विवरणपत्र

### योजना राबविण्याबाबतचे वेळापत्रक

| कार्यक्रम वेळापत्रक | अंतिम तारीख |
|---|---|
| ग्रामसभेमधून आराखडा तयार करणे | १५ सप्टेंबरपर्यंत |
| तालुका पातळीवर विभाग निहाय, गांवनिहाय एकत्रित आराखडा तयार करणे | १ ऑक्टोबर |
| जिल्हयाचा एकत्रित आराखडा | १० ऑक्टोबर |
| विविध कामांची अंदाजपत्रके तांत्रिक मंजूरीसह ग्रामपंचायतींना देणे. | २० ऑक्टोबर |
| ग्रामपंचायतींनी १५ टक्के स्वहिस्सा पंचायत समितीकडे जमा करणे | २५ ऑक्टोबर |
| ८० टक्के प्रथम हप्ता ग्रामपंचायतीकडे वर्ग करणे | १० नोव्हेंबर |
| प्रथम हप्त्याचे काम पूर्ण करुन तांत्रिक कर्मचा-यांचे मूल्यांकन देऊन देयके पंचायत समितीकडे सादर करणे | २० डिसेंबर |
| ६० टक्के दुसरा हप्ता ग्रामपंचायतीकडे वर्ग करणे, द्वितीय हप्त्याचे काम पूर्ण करुन तांत्रिक कर्मचा-यांनी मूल्यांकने देऊन देयके पंचायत समितीकडे सादर करणे. | ३० डिसेंबर |
| २० टक्के निधीचे काम ग्रामपंचायतीने पूर्ण करणे | १ फेब्रुवारी |
| तांत्रिक कर्मचा-यांनी अंतिम मूल्यांकन करणे | १० फेब्रुवारी |
| ग्रामपंचायतींना उर्वरित २० टक्के निधी वर्ग करणे | १५ फेब्रुवारी |
| सर्व कामांची तपासणी लेखा परिक्षण | ३१ मार्च. |